**महसूल व वन विभागाच्या लोकाभिमुख योजना, विकास प्रकल्प इ.च्या जाहिराती व प्रसिध्दीकरीताच्या खर्चास प्रशासकीय मान्यता ...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ओएफ़एम-२०२३/प्र.क्र.६६/ई**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १६ जुन, २०२३.

संदर्भ :- राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीचे दिनांक ३१/०५/२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या विविध विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या लोकाभिमुख योजना, विकास प्रकल्प इ.ची माहिती जनसामान्यांपर्यंत प्रभावीपणे पोहचविण्यासाठी जाहिराती तयार करण्याचे, वितरणाचे व सर्वंकष जाहिरात मोहिमा आखणी व अंमलबजावणीचे काम माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने दि. १६/०३/२०२० अन्वये सूचीबध्द केलेल्या जाहिरात संस्थाद्वारे केले जाते. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२/०४/२०२३ शासन निर्णयान्वये शासनाच्या विविध विभागांच्या योजनांसाठी प्रसिध्दी तसेच जाहिरात विषयक कार्ये पार पाडण्यासाठी “अ” “ब” व “क” या वर्ग वारीच्या जाहिरात संस्थांच्या सुचीस नवीन जाहिरात संस्थांची यादी निश्चित होईपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. महसूल व वन विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या लोकाभिमुख योजना, विकास प्रकल्प इ.ची माहिती जनसामान्यांपर्यंत प्रभावीपणे पोहचविण्यासाठी जाहिराती तयार करण्याचे, वितरणाचे व सर्वंकष जाहिरात मोहिमा आखणी व अंमलबजावणीचे काम सूचीबध्द केलेल्या जाहिरात संस्थाद्वारे करण्याकरिता निविदा प्रक्रिया करुन संस्थेची नेमणूक करणे आवश्यक आहे. महसूल व वन विभागाच्या दिनांक १८/०५/२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्यात आलेली आहे.राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीची बैठक अपर मुख्य सचिव (महसूल,मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांच्या अध्यक्षतेखाली दि.३१/०५/२०२३ रोजी दु.१२.०० वाजता आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत उक्त कामासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत सुचीबध्द केलेल्या संस्थाकडून सीलबंद निविदा मागविण्यात यावी, याबाबत सहमती झाली. त्याकरिता संबंधित कामासाठी निविदा प्रक्रिया राबविणे व अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देणे, ही बाब शासनाच्या विचारधीन आहे.

**शासन निर्णय :**

महसुल व वन विभागाच्या लोकाभिमुख योजना, विकास प्रकल्प इ. ची जाहिरात करणेकामी विभागाचा माध्यम आराखडा, कामाची व्याप्ती, निविदेमधील अटी व शर्ती व याकरिता येणारा अंदाजित खर्च रु.१,४५,००,०००/- (सर्व करांसहीत) ई-निविदा दाखल करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग दिनांक ०१/१२/२०१६ अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीचे, विहीत खरेदी नियमावलीचे पालन करून राज्यस्तरीय प्रशासकीय खरेदी समितीने खालीलप्रमाणे ई-निविदा प्रक्रिया राबवून खरेदी प्रक्रिया पुर्ण करण्यात यावी.

२.१ ई-निविदा दाखल करण्यास १५ दिवसांचा कालावधी देण्यात येईल.

२.२ सादरीकरणाला ६० टक्के गुण देण्यात येतील. वित्तीय देकारास ४० टक्के गुण देण्यात येतील. ज्या संस्थेचे याबाबींसाठी देकार निम्नतम असतील त्यास जास्त गुण प्राप्त होतील.

२.३ वरील प्रमाणे सादरीकरण व वित्तीय देकार याआधारे सर्वात जास्त एकूण गुण (QCBS-Quality and cost based selection) मिळालेल्या संस्थेची निवड करण्यात यावी.

३. सदर खर्च मागणी क्र.सी ,२०५२, सचिवालयीन- सर्वसाधारण सेवा , (००) (०१) महसूल व वन विभाग अनिवार्य, २६- जाहिरात व प्रसिद्धी (२०५२ ०२१२) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षात तरतूद केलेल्या अर्थसंकल्पिय निधीतून भागविण्यात येईल.

४. सदरचा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ मधील भाग पहिला उपविभाग-०३, अनुक्रमांक-४, परिच्छेद क्र.२७ (२) (ब) व वित्त विभाग, शासन परिपत्रक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.४/०४/२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६१९१३१४२०७०१९ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2023.06.19 13:15:33 +05'30'

**( संतोष वि. गावडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. जमाबंदी आयुक्त व संचालक, भुमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.
७. सर्व विभागीय आयुक्त.
८. सर्व जिल्हाधिकारी.
९. संचालक, लेखा व कोषागरे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. उद्योग सहसंचालक (भांख), उद्योग संचालनालय,नवीन प्रशासकीय भवन मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१३. आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१४. निवडनस्ती (ई).